**सन २०१३-१४ मध्ये भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत कळवण येथील १२ साठवण बंधाऱ्याच्या कामाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१६/प्र.क्र.७४/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: १७/०४/२०१७

वाचा-

1. **शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१३/प्र.क्र.६९/का-१९ दि. १४/०६/२०१४**
2. **शासन निर्णय क्रमांकः केंद्रिय-२०१६/प्र.क्र.१०/का-१९ दि. २०/०४/२०१६**
3. **आयुक्त आदिवासी विकास नाशिक, यांचे पत्र क्र. भासंअनु-२०१४/प्र.क्र.२३/भाग-०७/का.८(४), दि.१६/०९/२०१६**

प्रस्तावना -

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत सन २०१३-१४ साठी केंद्र शासनाकडुन भांडवली मालमत्ता अनुदानाच्या हप्त्यापोटी रु. ४८२३.७० लक्ष उपलब्ध करण्यात आले असुन सदर निधी खर्चासाठी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सुपुर्द करण्यात आला आहे. यातील नाशिक जिल्हयातील Construction of Storage Tanks, Check Dams, etc इत्यादी करिता रू.६२५.०० लक्ष निधी मंजूर झाला असून त्याअनुषंगाने प्रकल्प अधिकारी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प नाशिक व कळवण येथील बंधाऱ्यांच्या कामासाठी अनुक्रमे रु ३७५.०० लक्ष व रु. २५०.०० लक्ष किंमतीच्या बंधाऱ्यांच्या कामांना निधी मंजूर करण्यात आला आहे. यापैकी एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प नाशिक येथील १५ साठवण बंधाऱ्यांच्या कामांना वाचा क्र. २ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर मंजूर निधीच्या मर्यादेत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी वाचा क्र. ३ वरील पत्रान्वये सादर केलेल्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

प्रस्तुत निर्णयाद्वारे नाशिक जिल्हयातील साठवण बंधाऱ्यांच्या खालील तालिकेतील १२ कामांच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना खालील अटींचे अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर बांधकामाचे बाबतीत खालील अटींची पुर्तता करण्यात यावी.

(१) सिंमेट कॉंक्रिट बंधाऱ्यांसाठी अधीक्षक अभियंता, दगडी धरण मंडळ, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांनी निश्चित केलेल्या संकल्पचित्राचा वापर करावा.

३. या कामांची निविदा प्रक्रिया प्रचलित कार्यपद्धती / नियमांचे पालन करुन करावी .तसेच बांधकामासंबधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवाल शासनास विहित प्रपत्रात सादर करावे . प्रस्तुतची कामे पूर्ण झाल्यानंतर कामाच्या ठिकाणी सदरील काम केंदीय योजनेतून पूर्ण केले असल्याबाबतचा फलक लावण्यात यावा. सदर कामांची अंमलबजावणी ग्रामविकास व जलसंधारण विभागमार्फत करण्यात यावी.

| अ.क्र. | गावाचे नाव | तालुका | ग्रामपंचायत | कामाचा प्रकार | कामाचा अंदाजित खर्च (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|---|
| १ | गोपालपूर | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | १४.६५ |
| २ | हनुमंतपाडा | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | १०.३२ |
| ३ | हनुमंतपाडा-१ | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | १५.५१ |
| ४ | चापावाडी | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | १९.०४ |
| ५ | खार्दुर्डी | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.२८ |
| ६ | खार्दुर्डी-१ | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | १६.५७ |
| ७ | मोजपाडा | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.६१ |
| ८ | सुकापूर | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.९९ |
| ९ | रानपाडा | सुरगाणा | काठीपाडा | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.९८ |
| १० | चिकारपाडा | सुरगाणा | हातरूंडी | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.९९ |
| ११ | तळपाडा | सुरगाणा | हातरूंडी | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.९९ |
| १२ | हातरूडी | सुरगाणा | हातरूंडी | सिमेंट कॉक्रीट बंधारा | २४.९९ |
| | | | | **एकूण** | **२५०.००** |

४. सदर शासन निर्णय ग्राम विकास विभाग व जलसंधारण विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक अनौस-१७६/जल-१, दि.०९/१२/२०१६ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका , १९७८भाग पहीला ,उपविभाग -तीन ,परीच्छेद (२)२७ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१७१५०९१५९२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Lalitkumar R Dhaygude

Digitally signed by Dr. Lalitkumar R Dhaygude
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, cn=Dr. Lalitkumar R Dhaygude
Date: 2017.04.17 15:17:36 +05'30'

**( डॉ.ल.रं.धायगुडे )**
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. खाजगी सचिव,मा.मंत्री आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई

२. खाजगी सचिव,मा.राज्यमंत्री आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई

३. स्वीय सहायक, सचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
४. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
५. स्वीय सहायक,मा.प्रधान सचिव,ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक
७. मुख्य अभियंता,जलसंधारण विभाग,नाशिक.
८. उपसचिव,आदिवासी विकास,मंत्रालय,मुंबई
९. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०.निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई